**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण १०१८/प्र.क्र.१२२/१४-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १२ ऑक्टोबर, २०१८

**शासन आदेश**

सरळसेवा कक्ष अधिकारी तसेच पदोन्नत कक्ष अधिकारी यांनी मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गाच्या सन १९८६ ते २००० या कालावधीतील दिनांक १ जानेवारी रोजीच्या परस्पर सेवा ज्येष्ठतेबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे W.P.NO. २९८६/२०००, W.P.NO. २९८२/२०००, W.P.NO. ४९५८/२००३ आणि W.P.NO. ३३७४/२०११ या याचिका दाखल केल्या होत्या. मा. उच्च न्यायालयाने यावर एकत्रितरित्या दि.०६.०८.२०१८ रोजी निर्णय दिला आहे. मा. उच्च न्यायालयाने आपल्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या निर्णयास आठ आठवडयांची स्थगिती दिली होती. यासंदर्भात पदोन्नत अधिकाऱ्यांकडून मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका (SLP) क्र.२५१८१/२०१८ दाखल करण्यात आली असून, यावर दि.०१.१०.२०१८ रोजी झालेल्या सुनावणीत मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ च्या आदेशास स्थगिती दिलेली नाही. सबब, मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास अनुसरुन मंत्रालयीन कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उपसचिव व सह सचिव संवर्गाच्या दि.०१.०१.१९८६ पासूनच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्याबाबत कार्यवाही करावयाची आहे.

२. मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास अनुसरुन मंत्रालयीन कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उपसचिव व सह सचिव संवर्गाच्या दि.०१.०१.१९८६ पासूनच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्यासाठी अवर सचिव, सा.प्र.वि./कार्यासन १४ यांच्या पर्यवेक्षीय नियंत्रणाखाली पुढील अधिकारी/कर्मचाऱ्यांचा एक गट (Cell) स्थापन करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत असून, यामध्ये खालील अधिकारी/कर्मचारी यांचा समावेश करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकारी/ कर्मचारी यांचे नांव | पदनाम | सध्याचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | श्री.प्र.रा.साळी | कक्ष अधिकारी | वित्त विभाग |
| २ | श्री.रा.भि.महाजन | सहायक कक्ष अधिकारी | नगर विकास विभाग |
| ३ | श्री.सचिन राणे | सहायक कक्ष अधिकारी | सामान्य प्रशासन विभाग |
| ४ | श्री.कि.पां.देशपांडे | सहायक कक्ष अधिकारी | सामान्य प्रशासन विभाग |
| ५ | श्री.संतोष सावंत | लिपिक-टंकलेखक | सार्वजनिक बांधकाम विभाग |

३. संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा प्रथमत: दिनांक १६.१०.२०१८ ते दिनांक ३१.०१.२०१९ या कालावधीसाठी या विभागाकडून तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहीत करण्यात येत असून, आवश्यकतेनुसार सदर कालावधीत वाढ करण्यात येईल. उपरोक्त अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहीत करण्यात येणार असल्याने त्यांच्या वेतनादी विषयक बाबी त्या-त्या विभागाकडून हाताळण्यात येतील.

**४. संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता दिनांक १६.१०.२०१८ (म.पू.) रोजी सा.प्र.वि./ कार्यासन १४-ब (दालन क्र.५५७, ५ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई) येथे**

**रूजू अहवाल सादर करावा. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित विभागांनी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.**

५. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार, मंत्रालयीन कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उपसचिव व सह सचिव संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करावयाच्या असल्याने, अधिकारी/ कर्मचारी यांना कार्यमुक्त न करण्यासंदर्भात संबंधित विभागाच्या कोणत्याही विनंतीची दखल घेतली जाणार नाही. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनासाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी रुजू होण्यास हयगय केल्यास त्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई प्रस्ताविण्यात येईल.

६. सदर प्रयोजनासाठी नियुक्त गटाने (Cell) कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उपसचिव व सह सचिव संवर्गाच्या दि.०१.०१.१९८६ ते ०१.०१.२००४ या कालावधीतील पहिल्या टप्प्यातील अंतरिम ज्येष्ठतासूच्यांबाबतची कार्यवाही किमान ०३ महिन्यांच्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक राहील. तद्नंतर दुसऱ्या टप्प्यातील अंतरिम ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकीत करण्यात याव्यात. पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील अंतरिम ज्येष्ठतासूच्यांवर संबंधिताकडून प्राप्त होणाऱ्या हरकती/सूचना विचारात घेऊन त्या अंतिम करण्याबाबत कार्यवाही करणे आवश्यक राहील.

७. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार, मंत्रालयीन कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उपसचिव व सह सचिव संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४, १४-अ, १४-ब, कार्यासन १२ तसेच कार्यासन १६-ब मधील अधिकारी/कर्मचारी यांनी संबंधित गटास आवश्यक ते सर्व सहकार्य करावे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१७५७५३३६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.10.15 11:17:59 +05'30'

**( इ. मु. काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित कक्ष अधिकारी/सहायक कक्ष अधिकारी/लिपिक-टंकलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, संबंधित विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
२. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना).
३. सह/ उप सचिव (आस्थापना), संबंधित विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. अवर सचिव, का.१४/१४ अ/१४ ब, आणि का.१२ व का.१६ ब, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. निवडनस्ती.